विधानसभा निवडणूक-२०१९ करिता पोलीस आयुक्त, सोलापूर शहर यांनी बंदोबस्तासाठी भाडेतत्वावर अधिग्रहित केलेल्या खाजगी वाहनांच्या भाड्यापोटी देय असलेली रु.१८,९०,०६५/- इतकी रक्कम अदा करण्याच्या प्रस्तावास कार्योत्तर मंजूरी देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्र. संकीर्ण-०३२०/१३६/प्र.क्र.४४/ विशा १ अ**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक :- १४ सप्टेंबर, २०२०.

संदर्भ :- १. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्र.पोमसं /३०/वाह.अधि. वि.स.-१९/पो.आ.सोलापूर/१९/२०२०, दिनांक २४.०१.२०२०.
२. पोलीस उप-आयुक्त, सोलापूर शहर यांचे पत्र क्र.कक्ष-१(४)/वि.शा./वि.निवडणूक/वाहने भाडेत्वावर/७९४१/२०१९, दिनांक ०७.१२.२०१९.

**प्रस्तावना :-**

पोलीस आयुक्त, सोलापूर शहर आयुक्तालयाचे आस्थापनेवर एकुण चारचाकी वाहने ११५ उपलब्ध असुन आयुक्तालयाचे आस्थापनेवर ७ पोलीस ठाणे असुन ०३ विधानसभा मतदार संघ आहेत. पोलीस आयुक्त, सोलापूर शहर यांनी विधानसभा निवडणुकीचे वेळी कायदा व सुव्यवस्था राखण्याचे अनुषंगाने पोलीस दलाकडे उपलब्ध असलेली वाहने अपुरी असल्यामुळे १४४ खाजगी वाहने भाडेतत्वावर घेतलेली होती. उप प्रादेशिक परिवहन अधिकारी, प्रादेशिक परिवहन प्राधिकरण, सोलापूर यांनी दिनांक १०.१०.२०१९ रोजीच्या बैठकीत शासकीय कामासाठी भाडेतत्वावर घेण्यात येणा-या वाहनाचे भाडेपत्रक निश्चित केलेल्या दरानुसार सदरची वाहन भाडेतत्वावर दिनांक ०८.१०.२०१९ ते दिनांक २४.१०.२०१९ या कालावधीत घेतलेली होती. सदर भाडेतत्वावर घेतलेल्या १४४ खाजगी वाहनांच्या भाड्यापोटी एकुण रु.१८,९०,०६५/- (रूपये अठरा लाख नव्वद हजार पासष्ट फक्त) इतकी देय रक्कम अदा करण्याच्या प्रस्तावास कार्योत्तर मंजुरी देण्याची व सन २०२०-२०२१ या वित्तीय वर्षात उपलब्ध असलेल्या अनुदानातून सदर रक्कम खर्च करण्यास मंजुरी देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

दिनांक ०८.१०.२०१९ ते दिनांक २४.१०.२०१९ या कालावधीत सोलापूर शहरातील ०३ मतदार संघात विधानसभा निवडणूक-२०१९ करिता पोलीस आयुक्त, सोलापूर शहर यांनी कायदा व सुव्यवस्था राखण्याच्या अनुषंगाने बंदोबस्ताकरीता प्रादेशिक परिवहन प्राधिकरण, सोलापूर यांनी शासकीय कामासाठी भाडेतत्वावर घेण्यात येणा-या वाहनाचे भाडेपत्रक निश्चित केलेल्या दरानुसार भाडे तत्वावर घेतलेल्या १४४ खाजगी वाहनांच्या भाड्यापोटी देय असलेल्या एकुण रु.१८,९०,०६५/- (रूपये अठरा लाख नव्वद हजार पासष्ट फक्त) इतक्या रक्कमेस वित्तीय वर्ष २०२०-२०२१ च्या विहित लेखाशिर्षाखालील शिल्लक अनुदानातून अदा करण्याच्या प्रस्तावास कार्योत्तर मंजूरी देण्यात येत आहे.

सदरचा खर्च मागणी क्र. “बी-१, २०५५-पोलीस, १०९-जिल्हा पोलीस, (००) (०१)-जिल्हा पोलीस बल (२०५५०१६८), इतर खर्च-५०” या लेखाशिर्षाखाली सन २०२०-२०२१ या वित्तीय वर्षातील उपलब्ध अनुदानातून भागविण्यात यावा.

हा शासन निर्णय वित्तिय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग पहिला, उप विभाग-१ मधील अनुक्रमांक ६, नियम-४०(१) अन्वये प्रशासनिक विभागास असलेल्या पूर्ण अधिकारात निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२००९१४१४३०१२५३२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Deepak Tukaram Kharat

Digitally signed by Deepak Tukaram Kharat
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=902e21bb580b52a1e246b37b697ca20f0db2834da41f6840afd03916d8ed1b76, serialNumber=d8bd67045829179609f51b88a183cd0a4a3acd98db48b22b5faf5a9efc780e70, cn=Deepak Tukaram Kharat
Date: 2020.09.14 14:32:26 +05'30'

**(दि. तु. खरात)**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२. पोलीस आयुक्त, सोलापूर शहर.
३. जिल्हाधिकारी, सोलापूर.
४. महालेखापाल-१ (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई.
५. अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई.
६. जिल्हा कोषागार अधिकारी, सोलापूर.
७. वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. निवडनस्ती.